महिला व बाल विकास विभागांतर्गत राज्यात कार्यरत असलेल्या महिला व बाल विकासाच्या विविध शासकीय/निमशासकीय संस्थामधील गट-ड संवर्गातील रिक्त पदे बाह्य यंत्रणेव्दारे भरणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

**शासन निर्णय क्र.मबावि-२०१७/प्र.क्र.२००/का-७**

३ रा मजला, नवीन प्रशासन भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - १४ फेब्रुवारी, २०२०

वाचा : १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१०/ ८४/१०/विसु-१,दि.२७.०९.२०१०
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१,दि.०२.०२.२०१३
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१३/ प्र.क्र.११२/१३/विसु-१,दि.०२.१२.२०१३
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१६/ प्र.क्र.२९/१६/विसु-१,दि.०२.०८.२०१६
५) उद्योग,उर्जा व कामगार विभाग,शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१३/ कामगार-८,दि.२२.१२.२०१९
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.२२/कोषा प्रशा ४,दि.२९.०१.२०२०

**प्रस्तावना :-**

जनहित याचिका क्र.२८/२०१४ भारतीय स्त्री शक्ती विरुध्द महाराष्ट्र शासन आणि इतर या न्यायालयीन प्रकरणाचे अनुषंगाने रिक्त पदे भरण्याबाबत तात्काळ कार्यवाही करण्याचे आदेश असून शासन निर्णय क्र.२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१,दि.०२.०६.२०१५ अन्वये नविन पदे भरण्यास बंदी आहे, तसेच महिला व बाल विकास विभागात राबविण्यात येणाऱ्या योजना, सामाजिक कायदे व सामाजिक मुल्याशी निगडीत असल्यामुळे हा विषय अत्यंत संवेदनशिल आहे.क्षेत्रिय स्तरावरील कार्यालय तसेच शासकिय /निमशासकिय संस्थांमध्ये विविध संवर्गातील स्वयंपाकी,सफाईगार, वरीष्ठ काळजी वाहक, कनिष्ठ काळजी वाहक, पहारेकरी ही पदे मोठया प्रमाणावर रिक्त आहेत. तसेच कार्यरत कर्मचा-यांपैकी एखादा कर्मचारी गैरहजर राहील्यास संस्था पातळीवर मोठया अडचणी निर्माण होत होत्या. त्यामुळे महिला व बाल विकास विभागातील अत्यावश्यक सेवेतील पदे बाहययंत्रणेव्दारे तात्पुरत्या स्वरुपात भरल्यास संस्था पातळीवरील निर्माण झालेल्या अडचणी दुर होतील व विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजना, सामाजिक कायदे चांगल्या प्रकारे राबविणे सोईचे होईल. सदर बाब विचारात घेऊन महिला व बाल विकास विभागातंर्गत क्षेत्रियस्तरावरील कार्यालयातील तसेच शासकीय/निमशासकीय महिला/बालकांच्या संस्थांमधील अत्यावश्यक सेवेतील वरिष्ठ काळजी वाहक, कनिष्ठ काळजी वाहक, शिपाई,स्वंयपाकी,पहारेकरी,परीचर/कक्ष सेवक व सफाईगार इत्यादी पदांची कामे बाह्य यंत्रणेव्दारे करुन घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महिला व बाल विकास विभागातंर्गत क्षेत्रियस्तरावरील कार्यालयातील तसेच शासकीय/निमशासकीय महिला/ बालकांच्या संस्थांमधील अत्यावश्यक सेवेतील वरिष्ठ काळजी वाहक, कनिष्ठ काळजी वाहक, शिपाई, स्वंयपाकी, पहारेकरी, परीचर/कक्ष सेवक व सफाईगार एकूण १७९ मनुष्यबळाच्या मर्यादेत बाह्ययंत्रणेकडून उपलब्ध करुन घेण्यास सुधारीत आकृतिबंधाच्या अंतिम मान्यतेच्या अधीन राहून वित्त विभाग शासन निर्णय दि.०९.०६.२०१७ अन्वये गठित मा.अपर मुख्य सचिव (सेवा),सामान्य प्रशासन विभाग व सचिव (व्यय),वित्त विभाग यांच्या उप समितीच्या दि.२२.११.२०१९ रोजी झालेल्या सन २०१९ मधील एकोणीसाव्या बैठकीच्या इतिवृत्त अन्वये मान्यता देण्यात आली आहे. तद्नुषंगाने एकूण १७९ मनुष्यबळाच्या मर्यादेत उपरोक्त पदे बाहय यंत्रणेकडून उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

क) सदरचे काम करण्यासाठी ठेकेदार/कंपनी/संस्थेकडून विहित पध्दतीने निविदा मागवून,अत्यंत पारदर्शक पध्दतीने तसेच,सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बाह्ययंत्रणेची निवड करावी.

ख) बाह्ययंत्रणेव्दारे काम करुन घेण्यासाठी महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांनी संबंधित कंपनी/संस्थेबरोबर करार करावा. त्यामध्ये कामाच्या अटी व शर्ती नमूद कराव्यात.सदर कंपनी/संस्थेतर्फे काम करणारे कर्मचारी यांच्या सेवेचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर राहणार नाही,याची दक्षता घ्यावी.

ग) नियमित पध्दतीने पद भरण्यावरील खर्चाच्या तुलनेत बाह्यंत्रणेव्दारे कामे केल्यामुळे खर्चात १० ते २५ टक्के बचत होणे आवश्यक आहे. सदर बचत करण्याची तसेच, त्याची नोंद विहित प्रपत्रात ठेवण्याची जबाबदारी आयुक्तालयाची राहील.

घ) बाह्यस्त्रोताद्वारे घेण्यात येणाऱ्या सेवा एक महिन्याची नोटीस देऊन समाप्त करण्यात येतील अशी तरतूद करारनाम्यात करण्यात यावी.

ङ) बाह्ययंत्रणेद्वारे सेवा उपलब्ध करून घेताना वित्त विभागाचे परिपत्रक दि.२७.०९.२०१०, दि.०२.०२.२०१३,दि.०२.१२.२०१३,दि.०२.०८.२०१६ व दि.२९.०१.२०२० व शासन परिपत्रक उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग दि.२२.०८.२०१९ मधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकारेपणे पालन करण्याची दक्षता घ्यावी.

च) वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग, चार मधील अनुक्रमांक ११ अन्वये बाह्ययंत्रणेकडून करुन घेण्यात येणाऱ्या कामाच्या खर्चास मंजूरी देण्याचे पूर्ण अधिकार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आले आहेत. त्यामुळे प्रस्तुत कामासाठी येणाऱ्या खर्चास मंजूरी देण्याचा प्रस्ताव महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांनी स्वंतत्रपणे सादर करावा.

०३. सदर शासन निर्णय ,वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३/आ.पु.क,दि.०३.०१.२०२० अन्वये प्राप्त मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००२१४११०१५१२३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Lalsing
Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2020.02.14 17:15:22 +05'30'

**(ला.रा.गुजर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास योजना, नवी मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) १/२ मुंबई/ नागपूर.
४. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
५. सर्व अधिदान व लेखा अधिकारी
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. निवड नस्ती, का-७.